**सन २०१६-१७ मधील मंजूर अर्थसंकल्पीत**
**<u>तरतूदीचे वितरण करणेबाबत.</u>**
**डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना.**
**(राज्य योजना - सर्वसाधारण) (२४२५१००९).**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं ०९१६ / प्र.क्र.२७५ /२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०२ मार्च, २०१७

<u>वाचा</u>:-१. सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.सीसीआर ०६१२/प्र.क्र.२६९/२ स दि.३/१२/२०१२.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि.२०/४/२०१६
३. वित्त विभाग परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र क्र ३१/कोषा प्रशा ५ दिनांक १०.५.२०१६
४. सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं ०७१६/प्र.क्र.२२८/२ स दि.४/८/२०१६.

**<u>प्रस्तावना</u>:-**

राज्यातील शेतकऱ्यांना सहकारी कृषी पत संस्थांमार्फत पीक कर्जावरील व्याज दरात वसुलीशी निगडीत प्रोत्साहनात्मक सवलत देण्याचा निर्णय शासनाने दि. २४.११.१९८८ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार दि.२/११/१९९१ च्या शासन निर्णयानुसार डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना दि.०१/०४/१९९० पासून कर्ज घेतलेल्या शेतकऱ्यांना लागू करण्यात आली आहे. या योजने अंतर्गत सहकारी कृषी पतसंस्थेकडून पीक कर्ज घेणाऱ्या व त्याची प्रतीवर्षी ३० जून पर्यंत संपूर्ण परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना व्याज सवलत देण्यात येत आहे. राष्ट्रीयकृत बँका, ग्रामीण बँका व खाजगी बँकांकडून कर्ज घेणा-या शेतक-यांनाही सदर योजना लागू आहे. मात्र थकीत कर्जास तसेच मध्यम मुदत व दीर्घ मुदत कर्जास सदरची योजना लागू नाही. या योजने अंतर्गत शेतकऱ्यांना सहकारी कृषी पतसंस्थांमार्फत व बँकांमार्फत मिळणाऱ्या पीक कर्जावरील व्याज दराशी निगडीत व्याज सवलत देण्यात येत आहे. दि.०३.१२.१२ रोजीच्या शासन निर्णयानुसार रू.१.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक ३% व त्यापुढील रु.३.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक १% दराने व्याज सवलत लागू करण्यात आलेली आहे.

सन २०१६-१७ या चालू आर्थिक वर्षासाठी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेखाली मंजूर अर्थसंकल्पित तरतूदीचे वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

१) सन २०१६-१७ या चालू आर्थिक वर्षासाठी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेखाली एकूण रु. १८५०० लाख एवढी तरतूद मंजूर आहे. या तरतूदीपैकी संदर्भाधीन क्र ४ येथील शासन निर्णयान्वये रु ८८०० लाख एवढा निधी मंजूर करण्यात आलेला आहे. या अर्थसंकल्पीत निधीपैकी संपूर्ण अवितरीत निधीपैकी रु. **६००० लाख (रुपये साठ कोटी फक्त )** एवढया निधीचे वितरण करुन खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२ ) वित्त विभाग परिपत्रक क्र संकिर्ण २०१६/प्र क्र ८९/ अर्थसं ३ दिनांक २०.४.२०१६ अन्वये “३३ अर्थसहाय्य” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ पैकी परिच्छेद ९ वगळता सर्व परिच्छेद या योजनेस लागु नाहीत.

३) वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४) वित्त विभाग परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र क्र ३१/कोषा प्रशा ५ दिनांक १०.५.२०१६ मधील परिच्छेद “ब” मधील २ नुसार वित्त विभाग परिपत्रक क्र संकिर्ण २०१६/प्र क्र ८९/ अर्थसं ३ दिनांक २०.४.२०१६ च्या परिशिष्टातील अनु. क्रमांक १,२,५,६,७,व ८ संदर्भात सदर योजना ही नियमित राज्य योजनांतर्गत योजना असल्याने व “अर्थसहाय्य” या खाली अर्थसहाय्य वितरीत होत असल्याने नियोजन व वित्त विभागाची सहमतीची आवश्यकता नाही.

५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र २ त ३ येथील शासन परिपत्रकातील सूचनांचे पालन करावे.

६) वित्त विभाग परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र क्र ३१/कोषा प्रशा ५ दिनांक १०.५.२०१६ मधील परिच्छेद “अ” नुसार या प्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे :-

a. **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभाग परिपत्रक क्र संकिर्ण २०१६/प्र क्र ८९/ अर्थसं ३ दिनांक २०.४.२०१६ अन्वये “३३ अर्थसहाय्य” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

b. **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वत्तीय वर्षासाठी रु.१८५०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत आहे.

c. मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे.

d. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापसूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षीप्त देयके पारीत होत नाहीत.

e. स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

f. वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकसह सादर करावे :- याबाबत क्षेत्रीय कार्यालयांना सहकार आयुक्त स्तरावरुन सूचना देण्यात येत आहेत.

g. बांधकाम विषयक प्रस्तांवाना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिका-याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.

h. अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी रितसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत. :- लागू नाही.

i. खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

j. साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

७) वरील योजनेवर होणारा खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा व तो पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

**मागणी क्र.व्ही-२**
मुख्य लेखाशिर्ष-२४२५ सहकार
१०७,सहकारी पतसंस्थांना सहाय्य
(०२)(०४) डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना
(राज्य योजनांतर्गत) (दत्तमत्त) (२४२५१००९)
३३, अर्थसहाय्य

८) सदरचा निधी वितरीत करण्याकरिता लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या आदेशाव्दारे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचा विनियोग विहीत केलेल्या अटी व शर्तीनुसार करण्यात यावा. तसेच योजनेवर झालेला विकासमंडळ निहाय खर्च व लाभार्थ्यांची संख्या याची माहिती नियोजन विभागाच्या योजना माहिती प्रणाली (MP-SIMS) वर दर महिन्यात भरण्यासाठी कार्यासन १७-स कडे पाठविण्यात यावी.

९) सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि.२०/४/२०१६ तसेच वित्त विभागांच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१७/प्र क्र ८९/ अर्थ ३, दि. ८.२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३०२१५२८०५३६०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.03.02 15:29:09 +05'30'

( दि.म.राणे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
४. सह सचिव (व्यय-२ व अर्थ-१३) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
५. सह सचिव (कार्या १४३१) नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.
६. उपसचिव (अर्थसंकल्प-१७ स) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.
७. कोषागार अधिकारी, पुणे.
८. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
९. निवड नस्ती कार्या २ स, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.